महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाच्या कार्यालयाचे भाडे अदा करण्यासाठी अनुदान मंजूर करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## मराठी भाषा विभाग

**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१८/प्र.क्र.७३/भाषा-१,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**तारीख: ११ जानेवारी, २०१९.**

**वाचा :-**

१) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.४७/भाषा-१, दिनांक ०४.०९.२०१८.

२) महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाचे पत्र क्र.विनिमं-२०१८/लेखा/पुरवणी/ भाडे /१०७२ (अ), दि.२९.०५.२०१८.

३) महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाचे पत्र क्र.विनिमं-२०१८/विद्युत जोडणी/ सुधा.अदा.प/२१९६/२०१८, दि.२२.१०.२०१८.

**शासन शुध्दीपत्रक :-**

महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाच्या कार्यालयाचे थकीत भाडे अदा करण्यासाठी अनुदान मंजूर करण्याबाबत दिनांक ०४.०९.२०१८ च्या शासन निर्णयान्वये सप्टेंबर, २०१३ ते फेब्रुवारी, २०१८ या कालावधीतील (५४ माहिन्यांचे) थकीत भाडे रू.४७,३३,८५६/- (अक्षरी रूपये सत्तेचाळीस लाख तेहतीस हजार आठशे छप्पन फक्त) अदा करण्यास विश्वकोश निर्मिती मंडळाच्या संदर्भाधिन दि.२९.०५.२०१८ च्या प्रस्तावानुसार मंजूरी देण्यात आली होती.

तथापि, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाने संदर्भाधिन दि.२२.१०.२०१८ च्या पत्रान्वये उपरोक्त नमूद कालावधीतील मार्च, २०१७ चे भाडे रू.८७,६६४/- (अक्षरी रूपये सत्त्याऐंशी हजार सहाशे चौसष्ट फक्त) यापूर्वीच अदा केल्याने व परिगणना करताना अनावधानाने नमूद करण्याचे राहून गेल्याचे निदर्शनास आणून, सप्टेंबर, २०१३ ते फेब्रुवारी, २०१८ या कालावधीतील मार्च, २०१७ चे भाडे वगळून उर्वरित ५३ महिन्याच्या भाडे अदायगीची रक्कम रू.४६,४६,१९२/- (अक्षरी रूपये सेहचाळीस लाख सेहचाळीस हजार एकशे ब्याण्णव फक्त) इतकी असल्याचे स्पष्ट करून त्याप्रमाणे मंजुरी देण्याचा प्रस्ताव सादर कला होता.

२. वरील प्रस्ताव विचारात घेऊन, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळास सप्टेंबर, २०१३ ते फेब्रुवारी, २०१८ या कालावधीतील मार्च, २०१७ चे भाडे वगळून उर्वरित ५३ महिन्याच्या भाडे

अदायगीची रक्कम रू.४६,४६,१९२/- (अक्षरी रूपये सेहचाळीस लाख सेहचाळीस हजार एकशे ब्याण्णव फक्त) अदा करण्यास सदर शुध्दीपत्रकाद्वारे शासन मंजुरी देण्यात येत आहे.

३. सदर शासन शुध्दीपत्रक वित्त विभागाच्या अनौचारिक संदर्भ क्र.४९३/२०१८, दि.०२.०१.२०१९ अन्वये प्राप्त मंजूरीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१९०११११७०६३८५६३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aparna Arvind Gawde

Digitally signed by Aparna Arvind Gawde
DN: CN = Aparna Arvind Gawde, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Marathi Language
Date: 2019.01.14 10:49:29 +05'30'

**(अपर्णा अ.गावडे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
२. महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
५. मा.मंत्री (वित्त) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
६. मा.मंत्री (मराठी भाषा) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
७. अपर मुख्य सचिव (वित्त), प्रधान सचिव (वि.सु.), सचिव (व्यय) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. प्रधान सचिव, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
९. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
१०. सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
११. वित्त विभाग (व्यय-४ / अर्थसं-१४), मंत्रालय, मुंबई,
१२. सहसंचालक, लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालय, मुंबई,
१३. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. भाषा-१(संग्रहार्थ)